<u>अधिदान व लेखा कार्यालयात</u>
<u>समायोजित करावयाचे अनुदान</u>

**आयुर्विमा महामंडळाच्या कर्जावरील हमी शुल्काचा जिल्हा परिषदांनी शासनाकडे भरणा करणेबाबत . . .**

---

सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाच्या पहिल्या सहामाहीसाठी रु. १,२५,४८,३०३/- <u>हमी शुल्काचा हस्तांतरणाने भरणा . . .</u>

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांक :- एलआयसी - १४११ / प्र.क्र. ८३ / पापु-०४
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२ ,
दिनांक :- २६ एप्रिल, २०११.

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक, ग्रामविकास विभाग,क्रमांक : एलआयसी-१०८३/सीआर-२३५/५९, दिनांक :- १६ मार्च १९८४,
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शासन हमी-१०८८/१/७८ शासन हमी, दिनांक :- १८ नोव्हेंबर १९८८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/ शासन हमी, दिनांक :- ०५ नोव्हेंबर १९९९.
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, क्रमांक- एलआयसी-१००६/ प्र.क्र.५१/ पापु-०८, दिनांक- २० सप्टेंबर, २००६.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून जिल्हा परिषदाना कर्ज पुरवठा केला जातो. या कर्जाकरिता शासनाने हमी दिलेली आहे. शिल्लक असलेल्या कर्जाचे मुद्दल व व्याजाच्या रकमेवर प्रत्येक वर्षी प्रत्येकी रु. १००/- मागे रु. २/- या दराने सहामाही कालावधीसाठी वर्षातून दोन वेळा जिल्हा परिषदांनी शासनास हमी शुल्क भरावयाचे आहे. हमी शुल्काचा भरणा करण्यासाठी जिल्हा परिषदांना शासन १०० टक्के अनुदान देते. सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षाच्या दिनांक :- ३१ मार्च २०११ रोजी अदत्त असलेल्या घटनापेक्ष दायित्वावर ( Contingent Liability ) अनुज्ञेय असलेल्या व दिनांक :- १ एप्रिल, २०११ रोजी देय झालेल्या पहिल्या सहामाहीसाठी हमी शुल्काचा जिल्हा परिषदांनी भरणा करावयाचे विवरणपत्र सोबत जोडले आहे.

वित्त विभागाने लेखानुदान २०११-२०१२ अनुसार मालिका निधी विवरणपत्र अर्थ वितरण प्रणाली उपलब्ध करन दिली आहे. प्रस्तुत लेखा अनुदानान्वये माहे एप्रिल २०११ महिन्यामध्ये उपलब्ध करुन दिलेली उक्त प्रयोजनार्थ तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाची ( मुद्दलासह ) तसेच हमीशुल्काची परतफेड करण्यासाठी रु. २५९४.४० लक्ष इतकी जिल्हा परिषदांकरीता तरतूद करण्यात आली आहे. दि. ३१ मार्च, २०११ रोजी देय झालेल्या सहामाहीसाठी मुद्दल व व्याजाच्या अदत्त रकमेवर हमी शुल्क भरण्यासाठी जिल्हा परिषदांना **एकूण रु. १,२५,४८,३०३/- (रु. एक कोटी पंचवीस लाख अठ्ठेचाळीस हजार तीनशे तीन फक्त**) एवढे रोख अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

२)  हे अनुदान अधिदान व लेखा कार्यालयात समायोजनाने करावयाचे असल्याने हमी शुल्क भरणा करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, श्री शं. धे. चव्हाण यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उप सचिव, श्री. दु. र. चंद्रिकापुरे, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे.

३)  महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने मंजूर रक्कम काढावयाचे देयक अधिदान व लेखा कार्यालयात सादर करतेवेळी महसूल प्रधान जमाशिर्ष "००७५-संकीर्ण सर्व साधारण सेवा - १०८ हमी शुल्क (००७५ ०० ५८ ०१)" खाली सदर रकमा शासनाकडे हस्तांतरणाने जमा करावयाचे चलन सदर देयकास जोडावे. अधिदान व लेखा कार्यालयाने ही रक्कम जमा करावयाची असल्याने चलन संबंधीत देयकास जोडले आहे, याची खात्री करुनच देयक पारित करावे. या प्रयोजनासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक वाय- २, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता- ०१ - पाणी पुरवठा- १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम- (०१) स्थानिक क्षेत्र- (०१) (०१) ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा योजनांकरीता आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या देय रकमांच्या परतफेडीबाबतचा खर्च भागविण्यासाठी  जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ ११ ७३). ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" खाली खर्ची टाकण्यात यावा आणि या शीर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

४)  **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने** हमी शुल्काच्या रकमा हस्तांतरणाने शासनाकडे भरणा केल्याबाबतच्या चलनाच्या तीन साक्षांकीत सत्यप्रती या कार्यासनात व **सर्व जिल्हा परिषादांना प्रत्येकी चलनाच्या एक साक्षांकीत सत्यप्रत परस्पर पाठवावी.** तसेच शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांक:- एलआयसी - १४९१ / सीआर-१३४७ / ४०,  दिनांक:- ३ सप्टेंबर १९९३ मधील परिच्छेद क्रमांक (२) (फ) येथील हमी शुल्काचा भरणा करणासाठी विहीत केलेल्या पध्दतीनुसार जिल्हा परिषदांनी त्यांच्या लेख्यामध्ये सदर देवघेवीची नोंद घ्यावी.

५)  शासन परिपत्रक :- ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र. आरसीएन- १०८९/ सीआर-३०२७/ २८, दिनांक:- ५ सप्टेंबर १९९० मधील सूचनांप्रमाणे सदर मंजूर अनुदानाच्या खर्चाचा, **महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी मेळ घालावा** व विहित अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या विभागास  सादर करावा.

६)  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांच्या संगणक संकेतांक- २०११०४२६१४५९४४००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( ज. बा. कुलकर्णी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र (१), मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ),
२. महालेखापाल, महाराष्ट्र (२), नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ),
३. विभागीय आयुक्त ( सर्व ),
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( सर्व ),
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७. कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ( सर्व ),
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र शासन, कोकण भवन, नवी मुंबई,
९. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक लेखा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१०. वित्त विभाग ( व्यय-३ / अर्थोपाय / शासन हमी ), मंत्रालय, मुंबई  - ४०० ०३२.
११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्रमांक :- पापु-२० व संगणक शाखा.
१२. निवड नस्ती  :- पापु-०४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

## विवरणपत्र

सन २०११-२०१२ या वर्षाच्या पहिल्या सहामाहीकरिता जिल्हा परिषदांनी भरावयाचे हमी शुल्क, शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.एलआयसी- १४११ / प्र.क्र. ८३ / पापु-०४,

**दिनांक :- २६ एप्रिल, २०११ चे सहपत्र.**

| अ. क्र. | जिल्हा परिषद | हमी शुल्काची रक्कम रुपये (अंकी) | हमी शुल्काची रक्कम रुपये (अक्षरात) |
|---|---|---|---|
| १. | ठाणे | ३,१६,७८७ | तीन लक्ष सोळा हजार सातशे सत्याऐशी फक्त. |
| २. | रायगड | ३,२९,९२८ | तीन लक्ष एकोणतीस हजार नऊशे अठ्ठावीस फक्त. |
| ३. | रत्नागिरी | ६,१८,४८३ | सहा लक्ष अठरा हजार चारशे त्र्याऐंशी फक्त. |
| ४. | सिंधुदुर्ग | ३,०९,३०० | तीन लक्ष नऊ हजार तीनशे फक्त. |
| ५. | नाशिक | ५,५३,९८३ | पाच लक्ष त्र्येपन्न हजार नऊशे त्र्याऐंशी फक्त. |
| ६. | धुळे | २,८१,९७८ | दोन लक्ष एक्याऐंशी हजार नऊशे अठ्ठयाहत्तर फक्त. |
| ७. | नंदुरबार | ३,३७७ | तीन हजार तीनशे सत्त्यात्तर फक्त. |
| ८. | जळगांव | ७,५९,२२८ | सात लक्ष एकोणसाठ हजार दोनशे अठ्ठावीस फक्त. |
| ९. | अहमदनगर | ९,२३,९३१ | नऊ लक्ष तेवीस हजार नऊशे एकतीस फक्त. |
| १० | पुणे | ५,७२,८९५ | पाच लक्ष बाहात्तर हजार आठशे पंच्याण्णव फक्त. |
| ११ | सातारा | ७,४१,६७७ | सात लक्ष एकेचाळीस हजार सहाशे सत्त्यात्तर फक्त. |
| १२ | सांगली | ६,०७,६०३ | सहा लक्ष सात हजार सहाशे तीन फक्त. |
| १३ | सोलापूर | ४,२९,३७७ | चार लक्ष एकोणतीस हजार तीनशे सत्त्यात्तर फक्त. |
| १४ | कोल्हापूर | ४,८७,७२३ | चार लक्ष सत्याऐंशी हजार सातशे तेवीस फक्त. |
| १५ | औरंगाबाद | ३,७६,७२६ | तीन लक्ष शहात्तर हजार सातशे सव्वीस फक्त. |
| १६ | जालना | १,९६,२३४ | एक लक्ष शहाण्णव हजार दोनशे चौतीस फक्त. |
| १७ | परभणी | ३,३०,०७९ | तीन लक्ष तीस हजार एकोणऐंशी फक्त. |
| १८ | हिंगोली | ३४,०१६ | चौतीस हजार सोळा फक्त. |
| १९ | बीड | १,९६,२१८ | एक लक्ष शहयाण्णव हजार दोनशे अठरा फक्त. |
| २० | नांदेड | ४,०६,३०४ | चार लक्ष सहा हजार तीनशे चार फक्त. |
| २१ | उस्मानाबाद | २,१५,५९५ | दोन लक्ष पंधरा हजार पाचशे पंचाण्णव फक्त. |
| २२ | लातूर | ३,८६,१९८ | तीन लक्ष शहाऐंशी हजार एकशे अठ्ठाण्णव फक्त. |
| २३ | बुलढाणा | १,८२,०५७ | एक लक्ष ब्याऐंशी सतावन फक्त. |
| २४ | अकोला | ४,४२,३६६ | चार लक्ष बेचाळीस हजार तीनशे सहासष्ट फक्त. |
| २५ | वाशिम | १,८०२ | एक हजार आठशे दोन फक्त. |
| २६ | अमरावती | ५,१५,३८६ | पाच लक्ष पंधरा हजार तीनशे शहाऐंशी फक्त. |
| २७ | यवतमाळ | २,८६,१९४ | दोन लक्ष शहाऐंशी हजार एकशे चौ-याण्णव फक्त. |
| २८ | वर्धा | २,४३,४३२ | दोन लक्ष त्र्येचाळीस हजार चारशे बत्तीस फक्त. |
| २९ | नागपूर | ७,७९,११० | सात लक्ष एकोणऐंशी हजार एकशे दहा फक्त. |
| ३० | भंडारा | ४,३८,९१४ | चार लक्ष अडतीस हजार नऊशे चौदा फक्त. |
| ३१ | गोंदिया | ७२,४४१ | बहात्तर हजार चारशे एकेचाळीस फक्त. |
| ३२ | चंद्रपूर | ३,५९,९१९ | तीन लक्ष एकोणसाठ हजार नऊशे एकोणवीस फक्त. |
| ३३ | गडचिरोली | १,४९,०४२ | एक लक्ष एकोणपन्नास हजार बेचाळीस फक्त. |
| **एकूण** | | **१,२५,४८,३०३** | **(रु. एक कोटी पंचवीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार तीनशे तीन फक्त)** |

**सही /-**

**( ज. बा. कुलकर्णी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**<u>अधिदान व लेखा कार्यालयात</u>**
**<u>समायोजित करावयाचे अनुदान</u>**

**आयुर्विमा महामंडळाच्या कर्जावरील हमी शुल्काचा जिल्हा परिषदांनी शासनाकडे भरणा करणेबाबत . . .**

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाच्या पहिल्या सहामाहीसाठी रु. १,२५,४८,३०३/- हमी शुल्काचा हस्तांतरणाने भरणा . . .

**महाराष्ट्र शासन**

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांक :- एलआयसी - १४११ / प्र.क्र. ८३ / पापु-०४
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२ ,
दिनांक :- ४ ऑगस्ट, २०११.

**पहा :-** या विभागाचा समक्रमांकाचा दि. २६ एप्रिल, २०११ चा शासन निर्णय .

**<u>शुध्दिपत्र</u> :-** उपरोक्त शासन निर्णयात परिच्छेद क्र. २) मधिल श्री. शं. धे. चव्हाण, वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी यांच्या " **ऐवजी** " श्री. का. मा. विधाते, वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सही /-**
**( उ. म. मदन)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र (१), मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ),
२. महालेखापाल, महाराष्ट्र (२), नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ),
३. विभागीय आयुक्त ( सर्व ),
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( सर्व ),
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७. कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ( सर्व ),
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र शासन, कोकण भवन, नवी मुंबई,
९. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक लेखा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
१०. वित्त विभाग ( व्यय-३ / अर्थोपाय / शासन हमी ), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्रमांक :- पापु-२० व संगणक शाखा.
१२. निवड नस्ती :- पापु-०४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.